**महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना-२०१९ च्या प्रशासकीय खर्चासाठी जिल्हाधिकारी, गडचिरोली यांना निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ०२२०/प्र.क्र.४३/२-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०२०

वाचा :-

१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र. कृकमा-१२१९/प्र.क्र.१५७/२-स दि. २७.१२.२०१९
२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण ०१२०/प्र.क्र.२६/२-स दि. २४.०१.२०२०
३) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र. कृकमा-१२१९/प्र.क्र.१५७/२-स दि. १०.०२.२०२०

**प्रस्तावना:-**

महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना-२०१९ या योजनेच्या अंमलबजावणीमध्ये व्यापारी बँका व जिमस बँका यांचेकडून शेतकऱ्यांच्या कर्जखात्यांची माहिती योजनेमध्ये तयार करण्यात आलेल्या पोर्टलवर अपलोड करण्यात येत आहे. यासाठी बँकांकडून अपलोड झालेल्या कर्जखात्याच्या माहितीवर पोर्टलद्वारे संस्करण करुन पात्र लाभार्थ्यांची यादी निर्गमित होणार आहे. अशा यादीमधील समाविष्ट असलेल्या शेतकऱ्यांनी नजीकच्या कॉमन सर्व्हीस सेंटर/ स्वस्त धान्य दुकान/आपले सरकार केंद्रावर जाऊन आधार प्रमाणिकरणाद्वारे मान्यता दिल्यानंतर लाभाची रक्कम थेट कर्जखात्यात जमा होणार आहे.

महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना-२०१९ चा आढावा घेण्यासाठी मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि. ७.०२.२०२० रोजी दूरचित्रवाणी परिषद (Video Conference) आयोजित करण्यात आली होती. सदर दूरचित्रवाणी परिषदेत योजनेच्या अंमलबजावणीमध्ये येणाऱ्या विविध समस्यांवर चर्चा करण्यात आली. त्यावेळी गडचिरोली जिल्ह्यातील शेतकऱ्यांच्या आधार प्रमाणिकरणाच्या संदर्भात असे निदर्शनास आले की, गडचिरोली जिल्हा हा अतिदुर्गम डोंगराळ प्रदेशात वसलेला असल्याने या जिल्ह्यातील गावांत इंटरनेट व इतर तत्सम सुविधांचा अभाव आहे. त्यामुळे या योजनेची अंमलबजावणी करताना पात्र लाभार्थ्यांचे प्रमाणीकरण करण्यात अडचणी येत आहेत. सदर अडचण लक्षात घेऊन पात्र लाभार्थ्यांचे आधार प्रमाणीकरण करण्यासाठी ज्या नजिकच्या गावांत इंटरनेट सुविधा उपलब्ध आहेत अशा गावांत लाभार्थ्यांना ने-आण करण्याकरिता करण्यात येणाऱ्या वाहनव्यवस्थेसाठी गडचिरोली जिल्ह्याला अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजनेमध्ये शेतकऱ्यांच्या आधार प्रमाणीकरणासाठी गडचिरोली जिल्ह्यातील ज्या गावांत इंटरनेटची सुविधा नाही त्या गावांतील शेतकऱ्यांना इंटरनेट सुविधा असलेल्या नजिकच्या ठिकाणी वाहनव्यवस्थेद्वारे घेऊन जाण्यासाठी IEC activity साठी जिल्हाधिकारी, गडचिरोली यांच्या मागणीनुसार त्यांना यापूर्वी उपलब्ध करुन देण्यात आलेल्या रु. ५ लक्ष निधीव्यतिरिक्त रु.८,०२,०००/- (रु. आठ लक्ष दोन हजार फक्त) इतका निधी अदा करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना-२०१७ या योजनेसाठीचा सन २०१९-२० च्या IEC activity चे काम सुरू आहे. तरी यासोबत महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजनेच्या IEC activity चे काम करण्याचे निर्देश देण्यात येत आहेत.

आहरण व संवितरण अधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक यांचे कार्यालय, म.रा. पुणे यांनी जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, गडचिरोली यांना सदरहू रक्कम जिल्हाधिकारी, गडचिरोली यांना वितरीत करण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात यावी. सदरहू रक्कम मागणी क्रमांक व्ही- २, २४३५-- इतर कृषिविषयक कार्यक्रम, ००, ६० - इतर, १०१ -- शेतक-यांच्या कर्ज माफीसाठी योजना, छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना- २०१७ (राज्य स्तर) (२४३५ ००८२)-२६- जाहिरात व प्रसिद्धी (दत्तमत) या लेखाशीर्षाखालील सन २०१९-२० या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.२२.१.२०२० अन्वये विभागास अधिकार प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे, या परिपत्रकात नमूद सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत असल्याची खातरजमा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, म.रा.पुणे यांनी करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२१४१६५५३७५२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65ac b34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce1857 4a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.02.14 16:56:49 +05'30'

( रमेश शिंगटे )
अवर सचिव तथा सहनिबंधक,
सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
३. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
४. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था नागपूर
५. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, गडचिरोली
६. जिल्हाधिकारी, गडचिरोली
७. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प -१३, मंत्रालय, मुंबई
८ नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. कोषागार अधिकारी, पुणे.
१०. अवर सचिव (कार्यासन १७ स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय मुंबई
११. निवड नस्ती-२-स.